**सन २०२४-२५ करिता प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६-००२६) या योजनेंतर्गत निधी वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५७/भाग-२/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २५ मार्च, २०२५

**वाचा :-**

१. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५७/फ-९, दि.१२.०९.२०२४ व १५.१०.२०२४
२. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१४(भाग-२)/१२२१/२०२४-२५, दि. २०.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

वाचा क्र.१ येथील नमूद दिनांक १२.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६ ००२६) या योजनेंतर्गत नाशिक वनवृत्तातील पश्चिम भाग, नाशिक वनविभागात प्रशासकीय इमारत (वनभवन) बांधणेकरीता रु.५००.०० लक्ष इतका निधी तसेच नाशिक वनवृत्तातील पूर्व भाग, नाशिक वनविभागात निवासस्थान बांधणे करीता रु.२५०.३० लक्ष व पश्चिम भाग, नाशिक वनविभागात निवासस्थान बांधणेकरीता रु.३६८.५५ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे वाचा क्र.२ येथील नमूद पत्रान्वये कळविल्यानुसार मुख्य वनसंरक्षक (प्रा.) नाशिक यांनी केलेल्या विनंतीनुसार नाशिक वनवृत्तातील बीम्स प्रणालीवर पूर्व भाग, नाशिक वनविभागाकरीता वितरीत केलेला रु.२५०.३० लक्ष इतका निधी समर्पित केलेला आहे. तसेच पश्चिम भाग, नाशिक वनविभागातील निवास्थानाकरीता वितरीत करण्यात आलेला रु.३६८.५५ लक्ष इतका निधी खर्च होणार नसल्याचे कळविले आहे. त्यामुळे उपरोक्त नमूद कामांचा बचत होणारा (रु.२५०.३० + रु.३६८.५५) रु.६१८.८५ लक्ष इतका निधी वाचा क्र.१ येथील नमूद शासन निर्णयातील अन्य कामावर खर्च करण्यास परवानगी देण्याबाबतची अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी विनंती केली आहे. त्यानुषंगाने सदर निधी अन्य कामावर खर्च करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून वाचा क्र.२ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुलक्षून वाचा क्र.१ येथील दि.१२.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये नाशिक वनवृत्तातील पूर्व भाग, नाशिक वनविभागाकरीता रु.२५०.३० लक्ष व पश्चिम भाग, नाशिक वनविभागाकरीता रु.३६८.५५ लक्ष असा एकूण रु.६१८.८५ लक्ष इतका बीम्स प्रणालीवर वितरीत केलेला

निधी खालील तक्त्यातील नमूद कामासमोर दर्शविल्यानुसार वाचा क्र.१ येथील दि.१२.०९.२०२४ व १५.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६ ००२६) या योजनेतून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात येत आहे.:-

| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **या शासन निर्णयान्वये खर्च करण्यास परवानगी देण्यात आलेली रक्कम (रु.लक्ष)** |
|---|---|---|
| १ | नाशिक वनवृत्तातील पश्चिम भाग, नाशिक वनविभागात प्रशासकीय इमारत (वनभवन) बांधणे | ४५०.०० |
| २ | अकोला येथील नवीन वनभवन बांधकाम करणे | १६८.८५ |
| | एकूण:- | ६१८.८५ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२५१७१४४०८०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7e3227e15fe5debe28837d6e68d17c1f6e96d1a6dc7f27bc7e0f3ec07bbdfab8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B1AFE499C80878329FBB017E4922F7356CC5EDC76102E8FF88C7B9A67A322D9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2025.03.25 17:15:47 +05'30'

**( विवेक होशिंग )**

**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) ,नाशिक/अमरावती
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)